**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातर्गत “उपसंचालक” संवर्गास सुधारित वेतन संरचना मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०२३/प्र.क्र. ७३/का.१४२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३.०२.२०२३
२) वित्त विभाग, अनौ. संदर्भ क्र. २९१/सेवा-९, दि. ०४/०८/२०२३
३) वित्त विभाग अधिसूचना दि. ३० जानेवारी, २०१९
४) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. ईएसटी २०२२/प्र.क्र.८/का१४२६ दि. २८ जून, २०२२

**प्रस्तावना :-**

राज्य वेतन सुधारणा समिती २०१७ च्या अहवाल खंड-२ मधील वेतनश्रेण्यांविषयक व अनुषंगिक शिफारशी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये शासनाने स्वीकृत केल्या आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या जोडपत्र क्र.१ सोबतच्या सुधारीत वेतनस्तर मंजूर केलेल्या संवर्गांची माहिती दर्शविणाऱ्या विवरणपत्र-अ मधील अ.क्र. ८३ येथील 'उपसंचालक' संवर्गाबाबत खालीलप्रमाणे सुधारीत वेतनस्तर मंजूर केला आहे:-

| संवर्गाचे नाव | ७व्या वेतन आयोगानुसर मंजूर सुधारीत वेतनस्तर (रु.) | समितीने शिफारस केलेला ७ व्या वेतन आयोगातील सुधारीत वेतनस्तर (रु.) |
|---|---|---|
| उपसंचालक (निवडश्रेणी) | एस-२० : ५६१००-१७७५०० | एस-२३: ६७७००-२०८७०० |

२. अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मंजूर आकृतीबंधानुसार 'उपसंचालक' हा संवर्ग निश्चित करण्यात आला असून 'उपसंचालक (निवडश्रेणी)' हा संवर्ग अस्तित्वात नाही. वित्त विभागाच्या दि. ३० जानेवारी, २०१९ रोजी निर्गमित केलेल्या अधिसूचनेत देखील 'उपसंचालक' असेच पदनाम विहित केलेले आहे. 'उपसंचालक (निवडश्रेणी)' असा संवर्ग अर्थ व सांख्यिकी संचालनालयांतर्गत आढळून येत नाही. त्यामुळे उपसंचालक संवर्गातील अधिकाऱ्यांना सुधारित वेतनस्तर मंजूर करतांना अडचणी उद्भवत आहेत. यासंदर्भात स्पष्टीकरण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. राज्य वेतन सुधारणा समिती २०१७ च्या अहवाल खंड-२ मधील वेतनश्रेण्यांविषयक व अनुषंगिक शिफारशी स्वीकृत करण्याबाबत वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. वेपुर ११२१/ प्र.क्र.४/

सेवा-९, दिनांक १३/०२/२०२३ सोबतच्या जोडपत्र क्र.१ सोबतच्या सुधारीत वेतनस्तर मंजूर केलेल्या संवर्गांची माहिती दर्शविणा-या विवरणपत्र-अ मधील अ.क्र. ८३ येथे नमूद संवर्ग 'उपसंचालक (निवडश्रेणी)' याऐवजी 'उपसंचालक' अशी सुधारणा करण्याबाबत अधिसूचना निर्गमित करतांना वित्त विभागामार्फत कार्यवाही करण्यात येणार आहे. सद्यस्थितीत 'उपसंचालक' या पदास एस-२० रु.५६१००-१७७५०० ऐवजी एस-२३ रु. ६७७००-२०८७०० ही सुधारित वेतन संरचना मंजूर करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २९१/सेवा-९, दि. ०४/०८/२०२३ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२३१५४१०७५७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

PRAKASH BABANRAO GHADGE

Digitally signed by PRAKASH BABANRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2f90259e87b0960801edc01f52214ff1b58c7e3c653fb93bef856fb92941b9d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=77E1EBA3AEC9A0675410DB6FA1A645387767189322F02B94733DEF91397C59A0, cn=PRAKASH BABANRAO GHADGE
Date: 2023.08.24 14:50:42 +05'30'

**(प्र. ब. घाडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई-३२
४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७. सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व).
८. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व).
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
१०. उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय (सर्व).
११. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२. वित्त विभाग (कार्या-सेवा-९), मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती-१४२६